मा. सर्वोच्च न्यायालयाच्या आदेशानुसार कुटुंब नियोजन शस्त्रक्रियेनंतर उद्भवणाऱ्या बाबींसाठी (मृत्यू , असफलता व गुंतागुंत) केंद्र शासनाच्या मापदंडानुसार जेवढी नुकसान भरपाई देण्यात येते तितकीच नुकसान भरपाई संबंधित लाभार्थ्यास राज्य शासनाच्या निधीमधून देण्याकरिता नवीन लेखाशीर्ष निर्माण करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक आरोग्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः नलेशी-२०१८/प्र.क्र.५२७/कु.क.**

१० वा मजला, बी विंग, गो. ते. रूग्णालय संकूल इमारत
नवीन मंत्रालय, लो.टि. मार्ग, मुंबई- ४०० ००१
तारीख: २५ ऑक्टोंबर, २०१९

वाचा -

1) **महालेखाकार, महाराष्ट्र-१ चे पत्र क्रमांकः ख.वि/चा-१/सा.आ.विभाग/यू ओ आर-५७/ २०१९ - २०/९६८, दि. ३०.७.२०१९**

प्रस्तावना -

मा. सर्वोच्च न्यायालय यांनी जनहित याचिका क्र. ९५/२०१२ (देविका विश्वास विरुध्द केंद्र शासन) या प्रकरणाच्या अनुषंगाने दि. १४.९.२०१६ अन्वये केंद्र शासनाने राज्याला मार्गदर्शक सूचना दिल्या आहेत. यामधील सूचना क्र. ६ अन्वये कुटुंब नियोजन शस्त्रक्रियेनंतर मृत्यू, असफलता व गुंतागुंत झाल्यास संबधित लाभार्थ्यास कुटुंब नियोजन शस्त्रक्रिया नुकसान भरपाई या केंद्रीय योजने अंतर्गत केंद्र शासनाच्या मापदंडानुसार जेवढी नुकसान भरपाई देण्यात येते तितकीच नुकसान भरपाई राज्य शासनाच्या निधी मधून देखील देण्यात येईल अशा स्पष्ट सूचना केल्या आहेत. त्या अनुषंगाने या प्रयोजनार्थ नवीन लेखाशीर्ष उघडण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता. त्यास अनुसरुन पुढील प्रमाणे शासन निर्णय घेण्यात येत आहे.

## शासन निर्णय-

मा. सर्वोच्च न्यायालयाच्या आदेशानुसार कुटुंब नियोजन शस्त्रक्रियेनंतर उद्भवणाऱ्या बाबीसाठी (मृत्यू , असफलता व गुंतागुंत) केंद्र शासनाच्या मापदंडानुसार सम प्रमाणात राज्य शासनाच्या निधीतून संबंधित लाभार्थ्यास नुकसान भरपाई रक्कम देण्याकरिता खालील प्रमाणे नवीन लेखाशीर्ष निर्माण करण्यात येत आहे.

| | |
|---|---|
| मागणी क्रमांक आर-१ | Demand No R-1 |
| २२११ -कुटुंब कल्याण | 2211 - Family Welfare |
| ०० | 00 |
| १०५, नुकसान भरपाई | 105, Compensation |
| (०१) नुकसान भरपाई | (01), Compensation |
| (०१) (०३) **कुटुंब नियोजन शस्त्रक्रिये** अंतर्गत नुकसान भरपाई (कार्यक्रम) (२२११ १४६८) | (01) (03) Compensation under Family Planning Operation (Scheme) (22111468) |
| ३१ सहाय्यक अनुदान (वेतनेत्तर) | 31 Grant in Aid (Non-Salary) |

हा शासन निर्णय महालेखाकार, महाराष्ट्र १, मुंबई यांच्या दि.३०.७.२०१९ च्या पत्रान्वये, वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ अर्थ - ९, दि.०९.९.२०१९ तसेच नियोजन विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र.३११/का-१४११, दि.०३.९.२०१९ अन्वये प्राप्त मान्यतेने व सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१९१०२४१२१५३९५८१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Jamsher Samsher Tadavi

Digitally signed by Jamsher Samsher Tadavi
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Public Health Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=cc70f5be589b29aaa447f5cdd15c9826781de5daa02a4ecf339fb1d0559ab9d6, serialNumber=a92e218ede7b7c9acaa3bea18f6d46feab420783e12f260504f402b54de8c476, cn=Jamsher Samsher Tadavi
Date: 2019.10.25 14:31:19 +05'30'

**(ज.स.तडवी)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. महालेखापाल,महाराष्ट्र -१/२ (लेखापरीक्षा/(लेखा व अनुज्ञेयता), मुंबई/नागपूर

२. आयुक्त, आरोग्य सेवा तथा संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई
३. संचालक, आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई
४. अतिरिक्त संचालक, आरोग्य सेवा, कुटुंब कल्याण, पुणे
५. वित्त विभाग (अर्थ-९) मंत्रालय, मुंबई.
६. नियोजन विभाग (का.१४७२/१४११) मंत्रालय, मुंबई.
७. सह सचिव (ई आस) अर्थ व सांख्यिकी संचालनक, नवीन प्रशासन मंत्रालय, मुंबई.
८. अवर सचिव (अर्थसंकल्प),सा.आ.वि. मंत्रालय, मुंबई.
९. निवडनस्ती